**<u>यशवंत पंचायत राज अभियान सन २०१८ - २०१९</u>**
राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांना देण्यात येणाऱ्या पुरस्काराच्या अनुषंगाने गतवर्षाच्या प्रश्नावली व निकषामध्ये बदल करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन परिपत्रक क्रमांकः झेडपीए २०१८/प्र.क्र.१५२/पंरा-१

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीखः - २७ नोव्हेंबर,२०१८

<u>वाचा :-</u>

१) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१७/प्र.क्र. १४८/पंरा-१, दिनांक ९ जानेवारी, २०१८**

**शासन परिपत्रकः-**

राज्यात पंचायत राज संस्थांमधून प्रशासकीय व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभाग व राज्य अशा दोन्ही स्तरांवर “यशवंत पंचायत राज अभियान” ही पुरस्कार योजना सुरु करण्यात आली आहे. या विभागामार्फत राज्यातील ग्रामपंचायतींसाठी “स्मार्ट ग्राम व्हिलेज” ही योजना नव्याने राबविण्यात येत असल्याने “यशवंत पंचायत राज अभियान” या योजनेमध्ये ग्रामपंचायती समाविष्ट न करण्याचा निर्णय शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षापासून घेतला आहे.

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांना दि.२६ ऑक्टोंबर,२०१८ रोजी पुरस्कार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्याकरीता दिनांक ९ जानेवारी, २०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रश्नावली व निकष तयार करण्यात आले होते.

सन २०१८-१९ मध्ये सुध्दा प्रस्तुत प्रश्नावली तयार करावयाची आहे. त्याकरीता सन २०१८-१९ या वर्षातील जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या कामगिरीवर अवलंबून राहणार आहे. त्यामुळे सन २०१८-१९ मध्ये नव्याने सुरु करण्यात आलेल्या योजना यांचा समावेश करणे तसेच सन २०१८-१९ मध्ये ज्या योजना बंद झाल्या आहेत, त्या रद्द करणे, इत्यादी बाबींचा अभ्यास करुन, सुधारीत प्रश्नावली तयार करावयाची आहे. त्यासाठी उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग,औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | |
|---|---|---|
| १ | श्री. पारस बोथरा, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग,औरंगाबाद | अध्यक्ष |
| २ | श्री. नितीन दाताळ,उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( पंचायत ) जिल्हा परिषद,हिंगोली | सदस्य |
| ३ | श्री.डी.एम. मोकाटे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, खुलताबाद, जिल्हा औरंगाबाद | सदस्य |
| ४ | श्री.ए.एम.शिरसे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,औरंगाबाद सध्या प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा औरंगाबाद या पदाचा अतिरीक्त कार्यभार. | सदस्य- सचिव |

उपरोक्त समितीने यशवंत पंचायत राज अभियाना अंतर्गत गतवर्षाच्या उपरोक्त संदर्भाधिन दिनांक ९ जानेवारी,२०१८ च्या शासन निर्णयान्वये तयार करण्यात आलेल्या प्रश्नावलीचे निकष व मुद्दे यांचा अभ्यास करुन, त्यामध्ये नवीन कोणत्या योजना समाविष्ट करणे आवश्यक आहे, जुन्या कोणत्या योजना रद्द करणे आवश्यक आहे, कोणत्या मुद्यांमध्ये गुण कमी वा जास्त करणे आवश्यक आहे, इ. बाबींचा सखोल अभ्यास करुन शासनास **दिनांक ५ डिसेंबर,२०१८ पूर्वी** सविस्तर अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२७१०३७०४५८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Shantaram Yadav

Digitally signed by Sharad Shantaram Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7b2ace04cd5b33035f08de84acacbc24916dc2bb31884c10f28f127b001c2fea, cn=Sharad Shantaram Yadav
Date: 2018.11.27 11:15:45 +05'30'

**( शरद यादव )**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग,औरंगाबाद.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद/ हिंगोली

३. श्री. पारस बोथरा, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग,औरंगाबाद.

४. श्री.ए.एम.शिरसे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,औरंगाबाद सध्या प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा औरंगाबाद या पदाचा अतिरीक्त कार्यभार.

५. श्री. नितीन दाताळ,उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( पंचायत ) जिल्हा परिषद,हिंगोली

६. श्री.डी.एम. मोकाटे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, खुलताबाद, जिल्हा औरंगाबाद

७. निवडनस्ती ( पंरा-१ )